सुशिक्षित बेरोजगारांना आर्थिक सहाय्य योजनेअंतर्गत पदवीधर/पदवीकाधारक बेरोजगार लाभार्थींना शासकीय सेवेतील गट "क" मधील पदांवर नियुक्तीसाठी सवलती देण्याबाबत....

महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग

शासन परिपत्रक क्र. पअंक-१०९७/१७९३/प्र.क्र. ४/९८/१६-अ

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक - २०/५/९८.

वाचा:- १] शा. नि. उ. ऊ. व का. वि. क्रमांक ईएमपी-१४७८/३४९३/आयएनडी-१३, दिनांक ३०/११/१९७८,

२] शा. नि. सा. प्र. वि. क्रमांक एईएम-१०९२/३६५५/सीआर-९०/९२/१६-अ, दिनांक ३१/५/१९९३.

३] शा. नि. उ. तं. शि. आणि सेवायोजन विभाग, क्रमांक-पोटीई १०९१/[४०६]/सेयो-१, दिनांक २१/३/१९९५.

४] शा. नि. सा. प्र. वि. क्र. पअंक-१०९७/१७९३/प्र.क्र. ४/९८/१६-अ, दिनांक १९/३/१९९८.

५] शासन शुध्दीपत्र क्र. पअंक-१०९७/१७९३/प्र.क्र. ४/९८/१६-अ दिनांक २१/४/१९९८.

परिपत्रक :-

सुशिक्षित बेरोजगारांना आर्थिक सहाय्य योजनेअंतर्गत पदवीधारक/ पदवीकाधारक बेरोजगार लाभार्थींना शासकीय सेवेतील गट "क" मधील पदांवर नियुक्तीसाठी शासनाने काही सवलती देण्याबाबतचे आदेश शासन निर्णय, सा. प्र. वि. क्रमांक पअंक-१०९७/१७९३/प्र.क्र. ४/९८/१६-अ, दिनांक १९/३/१९९८ अन्वये निर्गमित केले आहेत. या आदेशांनुसार या बेरोजगारांना कमाल वयोमर्यादेत तसेच निवड मंडळांच्या परीक्षेतील

[ कृ. मा. प. ]

गुणात सवलत देण्याकरीता उमेदवारांनी अंशकालीन कर्मचारी म्हणून केलेल्या सेवेचा कालावधी विचारात घ्यावयाचा आहे. यास्तव यासाठी अंशकालीन उमेदवारांनी काम केल्याचा कालावधी प्रमाणीत करणे आवश्यक असल्याने सर्व जिल्हाधिकारी यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सोबत जोडलेल्या सहपत्रातील विहित नमुन्यात अंशकालीन बेरोजगार कर्मचा-यांना संबंधित तहसिलदारांच्या स्वाक्षरीखाली प्रमाणपत्र निर्गमित करावे अशा सुचना सर्व संबंधितांना देण्यात याव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ शि. श. हिरीजगनेर ]
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :-

१] सर्व जिल्हाधिकारी,
२] अध्यक्ष, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई,
३] सदस्य सचिव, सर्व प्रादेशिक निवड मंडळे,
४] संचालक, सेवायोजन, मुंबई,
५] निवड नस्ती.

शासन परिपत्रक, सा. प्र. वि. क्रमांक : पअंक–१०९७/१७९३/प्र. क्र. ४/९८/१६–अ,
दिनांक २७ मे, १९९८. चे सहपत्र.

कार्यालय –

क्र.

दिनांक :–

–: प्र मा ण प त्र :–

प्रमाणित करण्यात येते की, श्री / श्रीमती / कुमारी
सेवा योजन नोंदणी क्र.
हे शासन निर्णय, क्र. पअंक १०९७/१७९३/प्र. क्र. ४/९८/१६ [illegible] दिनांक १९/०३/१९९८ अन्वये मिळणा–या सवलतीस पात्र असुन, त्यांचा पदवी / पदवीका धारक अंशकालीन कर्मचारी म्हणून आता पर्यन्त एकुण कामाचा कालावधी हा वर्षे, महिने असुन, त्याकरीता त्यांना दरमहा रु. ३००/– या दराने मानधन मिळत होते.

शिक्का [ ]
तहसिलदार,